नोंदणी व मुद्रांक विभागाच्या अधिपत्याखालील अधिकारी/ कर्मचाऱ्यांच्या पदस्थापना, बदली याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ (१) स्थापन करणेबाबत...

# महाराष्ट्र शासन

महसूल व वन विभाग
शासन निर्णय क्रमांकः आस्थाप-२०२०/प्र.क्र.६०/म-१
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: २३ जुलै, २०२०

वाचा :-

१) शासन निर्णय:- सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही-२०१४/प्र.क्र.२६/१२, दि.३१.०१.२०१४ व दि.१९.०१.२०१५
२) शासन अधिसूचना सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/का.१२, दि.२८.०४.२०१५
३) शासन निर्णय:- महसूल व वन विभाग, आस्थाप-२०१४/५८०/प्र.क्र.१४०/म-१, दि.३०.०४.२०१५
४) शासन निर्णय:- महसूल व वन विभाग, आस्थाप-२०१७/प्र.क्र.२५३/म-१, दि.२०.०५.२०१७

प्रस्तावना :-

मा.सर्वोच्च न्यायालयाने रिट पिटीशन (सिव्हील) क्र.८२/२०११ मध्ये दि.३१.१०.२०१३ रोजी दिलेल्या निदेशास अनुसरुन, शासनाने गट-अ, गट-ब व गट-क मधील अधिकाऱ्यांच्या/ कर्मचाऱ्यांच्या पदस्थापना व बदल्या याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ स्थापना करण्याबाबतचा निर्णय संदर्भाधीन क्र.३ च्या शासन निर्णयान्वये घेतला होता. परंतु, मुद्रांक शुल्क व नोंदणी हा विषय दि.२८.१२.२०१६ पासून महसूल विभागाकडे सोपविण्यात आल्याने, नोंदणी व मुद्रांक विभागातील गट-अ मधील नोंदणी उपमहानिरीक्षक, सह जिल्हा निबंधक वर्ग-१ (उच्च श्रेणी), सह जिल्हा निबंधक वर्ग-१ (निम्नश्रेणी) आणि गट-ब मधील सह दुय्यम निबंधक/ जिल्हा निबंधक वर्ग-२ संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदस्थापना, बदल्याबाबत सक्षम अधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ (१) ची स्थापना संदर्भाधीन क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये करण्यात आलेली आहे. सदर शासन निर्णय अधिक्रमीत करून सुधारित शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

नोंदणी व मुद्रांक विभागातील अधिकारी/कर्मचारी यांच्या महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार गट-अ व ब (राजपत्रित) अधिका-यांच्या करावयाच्या नियतकालिक व अनियकालिक विनंती बदल्यांबाबत, पदस्थापना तसेच विभागबाह्य संवर्गात आणि प्रतिनियुक्तीसाठी तसेच गट ब (अराजपत्रित) व गट क मधील कर्मचा-यांच्या अनियतकालिक बदल्यांची शिफारस सक्षम प्राधिका-यांना करण्यासाठी पुढीलप्रमाणे नागरी सेवा मंडळ (१) ची स्थापना करण्यात येत आहे:-

**नागरी सेवा मंडळ (१)**

| | | |
|---|---|---|
| १. | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव (महसूल, मुद्रांक शुल्क व नोंदणी), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२. | अध्यक्ष |
| २. | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव ( आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२. | सदस्य |
| ३. | नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे. | सदस्य |
| ४. | सह सचिव/ उप सचिव (मुद्रांक), कार्यासन म-१ ,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२. | सदस्य सचिव |

नागरी सेवा मंडळ (१) सदर शासन निर्णयाच्या दिनांकापासून अस्तित्वात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००७२३१६०४२७७९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Tanaji Dhondiram Saravane

Digitally signed by Tanaji Dhondiram Saravane
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d2468c3c73dea535f5c36d6896860fd3419597af89877af8e084888bd31c4fab, cn=Tanaji Dhondiram Saravane
Date: 2020.07.23 16:44:44 +05'30'

**( ता. धों. सरावणे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. अपर मुख्य सचिव (महसूल, मुद्रांक शुल्क व नोंदणी), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२. सचिव ( आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
३. नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे.

४. मा.मंत्री (महसूल) / मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. सह सचिव/ उप सचिव (मुद्रांक), कार्यासन म-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६. सर्व नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक.
७. सर्व सह जिल्हा निबंधक तथा मुद्रांक जिल्हाधिकारी.
८. निवडनस्ती, कार्यासन म-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.